ह्या अंक विनामुल्य मिळण्यासाठी तसेच सूचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी

netaksharee@gmail.com



**(हक्क आणि अधिकार)**



**संपर्क**

ई-साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी
मॅरेथॉन चौक
ठाणे - ४००६०४
**९८६९६७४८२०**



नेटाक्षरी

आसवांचे सूर ओल्या पापण्या गातात आता
माझिया डोळ्यात आहे जागलेली रात आता

चांदणे आलेच नाही अंगणी माझ्या कधीही
अंगणाशी बोलतो मी चांदण्या शब्दात आता

कोणता कंदील लावू जिंकण्या काळोख येथे?
काजळी होते दिव्याची पेटणारी वात आता

मोगरा नाही तुझा मी तू मला माळू नको ना
वादळे का मागशी तू मोकळ्या केसात आता ?

सोसतो मी वार सारे आपुलाले वेगळाले
वेदनेला भाव आहे कोणत्या घावात आता ?

**मयुरेश साने**
**ठाणे**

# कुंपण

पश्चिमेकडे दिवस कलंडला
तशी कातरवेळ गहिरी होत गेली
सूर्याने पुसून टाकले आभाळाचे रंग
काळोखाची दरी खोल होत गेली

फुलांनी  मिटवून घेतल्या पापण्या
पानांनी पांघरली अंधाराची दुलई
तुझी पाठमोरी आकृती निरखत
तेऊ लागली माझ्या देहाची समई

आठवणीतली मंद सुरावट
घालू लागली काळजाशी हेलपाटा
हरवून गेलेल्या वळणावर
भेटत गेल्या जुन्याच वाटा

गळून गेलेला स्पर्शाचा बहर
मनाचा पिसारा विस्कटलेला
मिठी हरवल्या रात्रीवरला
वर्ख जरासा पुसटलेला

जवळ असूनही उरात नसलेलं
दुभंगलेलं तुझं माझं तारांगण
विखुरलेल्या आठवणींचं
रांगोळी पुसलेलं भकास अंगण

तुझ्याभोवती अदृश्य कुंपण
मी माझ्या कोशात गुरफटलेली
तुझ्या पापण्या स्वप्नात बुडालेल्या
माझी पापणी स्वप्नं भंगलेली

**संचिता कारखानीस**
**मुंबई**

# चार भिंतींना अताशा घर म्हणावे लागते !

कोणते नाते कुणाशी?....आठवावे लागते !
चार भिंतींना अताशा घर म्हणावे लागते !

माणसे न्याहाळताना आरश्याला कैकदा...
'चेहरा की मुखवटा' हे पारखावे लागते !

फक्त पाढे घोकुनी, सुटते कुठे अवघड-गणित?
दुःख-दुःखाने, सुखासाठी गुणावे लागते !

खुंटते काही कुणाचे सांग का कोणा विना?
श्वास येतो, श्वास जातो अन जगावे लागते !

यंत्रवत उरले जरी नाते तुझ्या-माझ्यातले...
बोलण्याचे तंत्र दोघांना जपावे लागते !

सद-विचारांची कितीही मंथने केली तरी...
सुर ना जुळता स्वतःशी गुण-गुणावे लागते !

सात फेरे मारल्याने प्रेम का जडते 'प्रिया'?
योग्य साथी लाभण्या 'युग-युग' झुरावे लागते !

**सुप्रिया (जोशी) जाधव**
**पुणे**

# जोहार...(गझल)

तिच्या संवेदनांचा बंध बेदरकार असला पाहिजे...
तिच्या त्या आठवांचा मेघही जरतार असला पाहिजे...

जरासा मी तिला दिसता कुठे, ती मूक होते तत्क्षणी...
जणू निःशब्द होणे हा तिचा, शृंगार असला पाहिजे...

कळेना हे कुणाला का? कसा? मी कृष्णवर्णी जाहलो !
तिच्या डोळ्यातला तो डोह, काळाशार असला पाहिजे !

तिच्या रमणीयशा स्मरणांमधे, मी जागलो राती किती !!
कधी कळणार ?? निद्रानाश हा 'आजार' असला पाहिजे !!

तिच्या स्पर्शामुळे देहास माझ्या गंध येतो कस्तुरी...
मला 'हरणा'प्रमाणे, बाणही रुतणार असला पाहिजे...

तिला विसरायचे ठरवूनही, स्मरतो तिला मी हरघडी...
तिचा माझ्याचसाठी, आर्जवी 'जोहार' असला पाहिजे...

**निरज कुलकर्णी**
**नाशिक**

# जाण

जेव्हा ती एक झळाळणारं
तेजस्वी अस्तित्व झाली,
आणि वेगानं भिरभिरणा-या
चकाकत्या तबकडीप्रमाणे
तिच्या परिघाच्या कणाकणातूण
ठिणग्या उडू लागल्या,
तेव्हा एखाद्या स्फुल्लींगाप्रमाणे
मी सैर भैर झाले...........

हवेत उडणारा प्रत्येक अग्निकण
मी होते.............
झळाळणा-या त्या तबकडीच्या
हरेक जाणीवेत मी होते...........
मी साक्षी होते, मी साक्षही होते...
संपूर्ण अस्तित्व
एका बिंदूत एकवटूनही
प्रत्येक तेजोकणाला व्यापून
मी होते..............

आणि हे सारं घडताना
अस्वस्थ, सामान्य,
अवाक प्रेक्षक देखील
मीच होते..........

कोळशाचा विस्तव,
आणि विस्तवाची राख बनताना
मी पुन्हा पुन्हा जगत होते,
पुन्हा पुन्हा मरत होते;

आणि एखाद्या स्वप्नाला पहावं
तशी तिच्यावर नजर खिळवून
अनेकातल्या एका रात्रीत निजणारी,
अनेकातल्या एका दिवशी उठणारी,
त्याच चाकोरीत फिरत
रहाणारी.....
मी होते !

सामर्थ्याचा वसा घेऊनही
असमर्थ जगत होते......
जगतच होते.............!

**प्रभा प्रभुदेसाई**
**चेन्नई**

रे जीवना किती मी साधा जगून गेलो
माझ्याच हासण्याला, जखमा विकून गेलो

काळोख हाय झाला, शहरात आज माझ्या,
येणार तू ग म्हणुनी, घर पेटवून गेलो

मी शोधले मला का? होते जगात सा-या,
ओठावरी तुझ्या मी मज सापडून गेलो

चर्चा बरीच झाली याचीच बघ स्मशानी,
ना लाकडे जळाली, मी का जळून गेलो

माझा जरी सख्या रे व्यवहार चोख होता,
मुद्दाम आज थोडे थोडे फसून गेलो

आपापल्या ठिकाणी सारे खरेच होते,
मी बोललोच म्हणुनी, खोटा ठरुन गेलो

श्रीमंत त्या सुखांना, मी सांग काय देवू?
कंगाल वेदनांना, अश्रू विकून गेलो

आली विजेपरी तू, या काळजात माझ्या,
तुटलो जरा जरासा, मग सावरुन गेलो

माझ्याच भावनांशी मी खेळलो असा की,
मी दुःख मांडताना, लिहिणे शिकून गेलो

**निशब्द (देव)**

# जरा जरासा....

श्वासात तू सुगंधा दरवळ जरा जरासा
ये ओंजळीत माझ्या ओघळ जरा जरासा !

तो गंध पाकळ्यांचा आता हवा कशाला ?
माळून घे मला तू चुरगळ जरा जरासा !

तू सोड राजसा हे नजरेतले इशारे
हो पापण्यात माझ्या काजळ जरा जरासा !

हे उन्मळून आले श्वासात आज वारे
दे पालवी नवी तू सळसळ जरा जरासा !

गुंतून जा सख्या रे या कुंतलात माझ्या
माझ्या नसा नसांनी साकळ जरा जरासा !

उसळून ये असा तू उधळून जा किनारे
माझ्या मिठीत हो तू वादळ जरा जरासा !

ये तू भरुन मेघा मन हे तहानलेले
होऊ नको रिता तू कोसळ जरा जरासा !

उघडून बंद दारे बघ आरसा नव्याने
हा चेहरा जुना तू हातळ जरा जरासा !

होता पुरा कधी तू पदरात सांग माझ्या
मी मागते तुला रे केवळ जरा जरासा !

**सुधीर मुळीक (निवडुंग)**
**मुंबई**

डोळ्यांदेखत धरणाचे दार
गडगड उघडतांना पाहिले
कोसळ आभाळाला तेव्हापासुन आडवं-टांगत धरण म्हणायला लागलो !!

तुझे सांगावे नाहिसेच आता
अन आले तर युगांनंतर एकदा
सांगावा घेउन येणा-या ‘खाक्या’ला तेव्हापासुन जागरण म्हणायला लागलो !!

कुण्या दिवंगत पुतळयाच्या उडालेल्या टवक्यामुळे
‘सजीवां’ची चिरफाड होतांना पाहिली
पुतळाधीन गजबज चौकांना तेव्हापासुन सरण म्हणायला लागलो !!

नजरचुकव्या प्रश्नांच्या आरश्यापल्याड
गहनसा शोध घेत राहिलो
विस्कटल्या भांगाला तेव्हापासुन कारण म्हणायला लागलो !!

भिजल्या धावपळीत भिवईमध्य टिकली
ओठाजवळ ओघळलेली पाहिली
कोरचांदव्याला तेव्हापासुन कळवेडं मरण म्हणायला लागलो !!

नक्षत्र झुंबरं विझवुन नव्या दिवशी
नव्या आकाराचे उमेद देऊ लागला
सुर्य नावाच्या भगव्या मौनीबाबाला तेव्हापासुन ऐरण म्हणायला लागलो !!

कविता एक एक वाचत गेलो
आशिर्वादासम भास होत गेले
तात्याराव तुमच्या ‘विशाखे’ला तेव्हापासुन चरण म्हणायला लागलो !!

**प्राजक्त देशमुख**
**नाशिक**

# --- बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ ---

तीन वर्षांपुर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहून अधिक ई पुस्तके विनामूल्य दिली. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ना धों महानोर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे चारशे नवीन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या, दहशतवाद अशा विषयांवरचं साहित्य मांडलं. विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले. नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणाऱ्या पुस्तिकांची मालिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना उभारी दिली.

लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामूल्य पोचवण्याची आमची परंपरा आम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहू द्या. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फ़क्त लाखभर लोकांपर्यंत मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलंच पाहिजे असं नाही वाटत आपल्याला? आणि त्यासाठी काही फ़ार करायची गरज नाही बंधो. **आपल्या ओळखीच्या बारा लोकांची, बारा मराठी लोकांची मेल आय डी द्याल?** जास्त दिलीत तरी हरकत नाही. पण निदान १२ लोकांची मेल आय डी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी बारा आय डी पाठवले तर लाखाचे बारा लाख व्हायला कितीसा वेळ लागणार? बारा लोकांची मेल आयडी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही **"ई साहित्य पाठीराखे"** म्हणून वेगळे मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सूचना मागवू. तुमच्याकडून मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

### तर होणार ना ई साहित्यचे पाठीराखे ?

फ़क्त आपल्या खास मराठी मित्र नातेवाईकांच्या बारा मेल आय डी खालील पत्त्यावर पाठवा.

**esahity@gmail.com**

खात्री बाळगा, या मेल्सचा कोणत्याही तऱ्हेने गैरवापर केला जाणार नाही. त्यांना जाहिराती पाठवून किंवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. यांचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

- अधिक माहितीसाठी –

**: संकेत स्थळ :**

**www.esahity.com**

**: फेसबुक :**

**https://www.facebook.com/esahity**

--------------------



--------------------